

## उष:काल आता दूर नाही....!

स्वातंत्र्यप्राप्तीच्या नंतरच्या काळात सरकारने सशस्त्र क्रांतिकारकांवर दात धरला. त्यामुळे त्यांची अक्षरशः कुचंबणा झाली. यात भगतसिंहांचा परिवार, रामप्रसाद बिस्मील यांचा परिवार, सावरकरांचा परिवार, बटुकेश्वर दत्त यांचे जीवन, माता जगराणी देवींच्या हालअपेष्टा अशी कितीतरी उदाहरणे आपल्या डोळ्यांसमोर येतात.

क्रमिक पुस्तकांतही क्रांतिकारकांची चरित्रे येऊ दिली नाहीत, त्यांच्या यशोगाथा बासनात गुंडाळून दडपण्याचा प्रयत्न केला गेला. ठीक आहे, पण महात्माजींची शिकवण तरी अंमलात आणलीत का? तर ती पण नाही. जे आत्म्यातून रंगलेले असतात त्यांना बाहेरून रंगावे लागत नाही. पण बाहेरुन रंगून बसलेल्यांनी देशाचा विचार न करता आपले उखळ पांढरे करण्यासाठी ह्यात घालविण्यात धन्यता मानली. राष्ट्रनिष्ठा लोप पावली, देशभक्ती देशोधडीला लागली. तिच्या जागी धनभक्ती, खुर्चीभक्ती, भाणाभक्ती, सीमाभक्ती अशा वेगवेगळ्या भक्त्या आल्या.

स्वातंत्र्याची साथ करणाऱ्या क्रांतीची पाऊले आज इथे तिथे उमटलेली दिसतात, नव्हे दृश्यमानही होताहेत. या पाऊलखुणा या भूमीवर या जमिनीवर शोधताहेत, उद्याचे नेते. जे मतांच्या पेट्यांतून किंवा प्रसादांतूनच उत्पन्न होणार नाहीत, तर ते वर येतील या स्वातंत्र्यसेनानींच्या, क्रांतिवीरांच्या, विचारवंतांच्या, देशोधडीला लागलेल्या देशभक्तांच्या सांडलेल्या रक्तातून, जाज्वल्य देशाभिमानातून, त्यागातून आणि हे करतील या देशासाठी असीमांचे साहस.

तो उष:काल आता दूर नाही.

– प्रमोद मारुती मांडे




ISBN (Paperback): 978-81-954416-0-0
AZADI KE DIWANE

आझादी के दिवाने : ४०००+ क्रांतिकारक....

लेखक : प्रमोद् मारुती मांडे

# आझादी के दिवाने

४०००+ क्रांतिकारक...



लेखक – प्रमोद् मारुती मांडे

# आझादी के दिवाने

## ४०००+ क्रांतिकारक....

**लेखक : प्रमोद मारुती मांडे**

संपादक : अनिकेत अंकुश यादव
प्रकाशक : अनिकेत एंटरप्रायझेस,
४१७, शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.




**ग्रंथाची किंमत**
**रुपये ५००/-**

**एकूण पृष्ठसंख्या -४७६**

**१२ रंगीत पाने**

**हार्ड बाऊंड**

## ग्रंथाची वैशिष्ट्ये -

- स्वातंत्र्य संग्रामातील समिधा, स्वातंत्र्य संग्रामातील अंगार व स्वातंत्र्य संग्रामातील अग्निशलाका या ३ ग्रंथांचा एकत्रित मराठी ग्रंथ.
- १४६ क्रांतिकारकांच्या प्रकाशचित्रांसह रोमहर्षक माहिती
- ८००+ स्वातंत्र्य सैनिकांची छायाचित्रे
- ४०००+ क्रांतिकारकांची वर्णानुक्रमानुसार यादी
- माहितीपूर्ण परिशिष्टे

**Publisher : Aniket Enterprises**
Address : 417, Shukrawar Peth, Opp. Khadak Police Station, Shivaji Road, Pune - 411002.
Mob. 7588291483, 9822743244. Email - aniketyadav84@gmail.com

# आझादी के दिवाने

**(स्वातंत्र्य संग्रामातील समिधा, स्वातंत्र्य संग्रामातील अंगार व स्वातंत्र्य संग्रामातील अग्निशलाका या ३ ग्रंथांचा एकत्रित ग्रंथ.)**

**✻ १४६ क्रांतिकारकांच्या प्रकाशचित्रांसह रोमहर्षक माहिती ✻**

**✻ ८००+ स्वातंत्र्य सैनिकांची छायाचित्रे ✻**

**✻ ४०००+ क्रांतिकारकांची वर्णानुक्रमानुसार यादी ✻**

**✻ माहितीपूर्ण परिशिष्टे ✻**


**मूळ ग्रंथांचे लेखक : प्रमोद मारुती मांडे**

**संपादक : अनिकेत अंकुश यादव**

# आझादी के दिवाने
# AZADI KE DIWANE

**मूळ ग्रंथांचे लेखक – प्रमोद मारूती मांडे**
**Author - Pramod Maruti Mande**

**संपादक – अनिकेत अंकुश यादव**
**Editor - Aniket Ankush Yadav**

**सुधारीत आवृत्ती–** दि. १५ ऑगस्ट २०२१,
७५ वा स्वातंत्र्यदिन (अमृतमहोत्सवी वर्ष)



प्रकाशक – **अनिकेत एंटरप्रायझेस, श्री. अनिकेत अंकुश यादव,**
४१७, शुक्रवार पेठ, खडक पोलीस स्टेशन समोर,
शिवाजी रोड, पुणे ४११००२, महाराष्ट्र, भारत.
Mob. 9822743244 / 7588291483,
Email - aniketyadav84@gmail.com

मुद्रक – **न्यू भारत प्रिंटर्स अँड बाईंडर्स, पुणे.**

मुखपृष्ठ – **Brand +**
Flat No.101, Lake Breeze, S.No.50/3, Varkhade Nagar,
Gujarwadi Road, Katraj, Pune - 411046.
Toll Free No. 1800 210 3696.

किंमत – रु. ५००/–

**ISBN No.-** **978-81-954416-0-0** (Paperback)



**महाराज !**

आपण निर्माण केलेले स्वराज्य कपाळकरंटेपणामुळे आणि नेभळट नेतृत्वामुळे पुन्हा पारतंत्र्यात गेले होते. या पारतंत्र्याच्या शृंखला तोडण्यासाठी आपला आदर्श समोर ठेवून अनेक क्रांतिकारकांनी आपल्या प्राणांची आहुती दिली. स्वातंत्र्यासाठी आपल्या सर्वस्वाचा त्याग करणाऱ्या क्रांतिकारकांच्या पवित्र स्मृतीस हे पुस्तक अर्पण करीत आहे.

आपला पाईक,

**प्रमोद मारुती मांडे**

## (पहिल्या आवृत्तीमधील अर्पणपत्रिका)

**महाराज !**

सध्या स्वराज्य आहेच पण 'सुराज्या'साठी आपण पुन्हा अवतार धारण करावा अशी विनंती मागल्या खेपी आपणांस केली होती. क्षमा असावी महाराज, लिहीताना एक गोष्ट राहून गेली. आपल्या सोबत आपल्या निष्ठावान सवंगड्यांनाही घेवून यावे, ही विनंती. अन्यथा, आपले काही खरे नाही, महाराज.

हिंदुस्थानात खरा निष्ठावान कोण आणि विष्ठावान कोण? हे ओळखणे कठिण झाले आहे. येथे सध्या 'गिव्ह अँड टेक' पॉलिसी चालू आहे. याचा अर्थ आपल्याला नाही कळणार. आपल्या राज्यात 'अर्धी विलायती' आणि 'हाफ मराठी' चालू आहे. आपल्या राज्यव्यवहारकोषात हे शब्द नव्हतेच. आपल्या सवंगड्यांनाही हे माहिती नव्हते.

नाहीतर, गजापूरच्या पराक्रमाच्या वेळी बाजीप्रभूने 'गृहखात्याची', पुरंदरच्या वेळी मुरारबाजीने 'संरक्षण खात्याची' आणि सिंहगडच्यावेळी तानाजीने 'महसूल खात्याची' मागणी केली असती.

आणि म्हणूनच राष्ट्रनिष्ठा, कर्तव्यनिष्ठा आणि स्वामीनिष्ठेचे आदर्श उदाहरण घालून देणाऱ्या बाजीप्रभू, मुरारबाजी आणि तानाजी मालुसरे या भीमपराक्रमी पुरुषोत्तमांच्या पवित्र स्मृतीस 'क्रांतिकारकांच्या समिधाचे' हे पुस्तक अर्पण करीत आहे....

महाराज, विनंतीचा स्वीकार व्हावा.

आपला पाईक,

**प्रमोद मारुती मांडे**

## ✻ अनुक्रमणिका ✻



**– १४६ क्रांतिकारकांची फोटोंसह माहिती –**

**– परिशिष्टे –**

✻✻✻



## सुधारीत आवृत्तीच्या निमित्ताने :

प्रमोद मारूती मांडे उर्फ 'भाऊ' यांनी लिहीलेली 'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा', 'स्वातंत्र्यसंग्रामातील अंगार' व 'स्वातंत्र्यसंग्रामातील अग्निशलाका' ही क्रांतीकारकांची सचित्र माहिती असलेली ३ पुस्तके होती.

'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा' या पुस्तकात १११ क्रांतिकारकांच्या चरित्राचा समावेश असून त्याच्या मराठी भाषेत ३ आवृत्या प्रसिद्ध झालेल्या होत्या. त्यापैकी पहिली आवृत्ती ही दि. १५ ऑगस्ट १९९८ (स्वातंत्र्यदिन) रोजी, दुसरी आवृत्ती दि. १५ ऑगस्ट १९९९ (स्वातंत्र्यदिन) रोजी तर तिसरी आवृत्ती दि. ९ ऑगस्ट २०१४ (क्रांतिदिन) रोजी प्रसिद्ध करण्यात आलेली आहे. तसेच या पुस्तकाचे इंग्रजी, गुजराथी व कन्नड या भाषेत अनुवाद प्रसिद्ध झालेले आहेत.

याशिवाय प्रमोद मांडे सरांनी लिहीलेल्या 'स्वातंत्र्यसंग्रामातील अंगार' व 'स्वातंत्र्यसंग्रामातील अग्निशलाका' या ग्रंथात अनुक्रमे २० व १७ क्रांतिकारकांची सचित्र माहिती देण्यात आलेली होती. हे तीनही ग्रंथ आदरणीय मांडे सरांच्या ओजस्वी व प्रभावी शैलीतून शब्दबद्ध झालेले होते. हे तीनही ग्रंथ सध्या वाचकांना मिळणे दुरापास्त होऊन बसले होते. त्यामुळे तीनही ग्रंथ वेगवेगळे प्रसिद्ध करण्याऐवजी एकत्रितरित्या वाचकांना उपलब्ध करून देण्याचा उद्देश यामागे आहे. मात्र हे करताना मूळ ग्रंथांमधील आदरणीय मांडे सरांची मनोगते, प्रस्तावना, क्रांतिकारकांची माहिती, परिशिष्टे इत्यादी माहिती आहे तशीच ठेवलेली आहे. मूळ ग्रंथाच्या मजकूरात बदल न करता वरील तीनही ग्रंथ एकत्रितरित्या या एकाच ग्रंथात देण्यात आलेला आहे.

वरील तिनही ग्रंथांमध्ये क्रांतिकारकांच्या जन्म मृत्यूंच्या तारखा व ठिकाण यांमध्ये काही तफावती होत्या. या प्रस्तुत सुधारीत आवृत्तीत त्यामध्ये सुधारणा केलेल्या आहेत. उदाहरणार्थ : जुन्या ग्रंथात कित्तूरच्या राणी चन्नम्मा यांचे जन्मवर्ष १७७८ एवढेच नमूद होते. इतर काही साधनांमध्ये जन्माची नोंद मिळाल्यामुळे

जन्म-२३ ऑक्टोबर १७७८ असा घेतलेला आहे. तसेच मृत्यूची तारीख २ फेब्रुवारी होती, ती २१ फेब्रुवारी अशी घेण्यात आलेली आहे. याव्यतिरीक्त बदललेल्या नोंदी पुढीलप्रमाणे -

| **पूर्वीच्या ग्रंथातील नोंद** | **सुधारीत आवृत्तीतील नोंद** |
|---|---|
| राणी चन्नम्मा : जन्म-१७७८ | जन्म - २३ ऑक्टोबर १७७८ |
| राणी चन्नम्मा : मृत्यू-२ फेब्रु.१८२९ | मृत्यू - २१ फेब्रुवारी १८२९ |
| उमाजी नाईक : जन्म-१७९१ | जन्म - ७ सप्टेंबर १७९१ |
| अजीमुल्ला खान : जन्म-(नोंद नाही) | जन्म - सप्टेंबर १८३० |
| नानासाहेब पेशवे : जन्म-(नोंद नाही) | जन्म - १८२४ |
| बहादुरशहा जफर : जन्म-(नोंद नाही) | जन्म - ऑक्टोबर १७७५ (दिल्ली) |
| शेरअली : फाशी-८ फेब्रु.१८७२ | फाशी - ११ मार्च १८७२ |
| हजरत महल : जन्म-(नोंद नाही) | जन्म-अंदाजे १८२०(फैजाबाद,उ.प्र.) |
| हजरत महल : मृत्यू-१८७४ | मृत्यू - १८७९ |
| झिनत महल : मृत्यू-१८८२ | मृत्यू - जुलै १८८६ |
| रामसिंह कुका : जन्म-१८२४ | जन्म - फेब्रुवारी १८१६ |
| रामसिंह कुका : मृत्यू - १८८५ | मृत्यू - नोव्हेंबर १८८५ |
| वासुदेव हरी चापेकर : जन्म-१८७९ | जन्म - १८८० |
| बाळकृष्ण चापेकरः फाशी-१० मे १८९९ | फाशी - १२ मे १८९९ |
| बिरसा मुंडा : जन्म-(नोंद नाही) | जन्म-१५ नोव्हें.१८७५ (उलिहतू,झारखंड) |
| बिरसा मुंडा : मृत्यू-२ जून १९०० | मृत्यू - ९ जून १९०० |
| खुदीराम बोसः मृत्यू-११ ऑगस्ट १९०७ | मृत्यू-११ ऑगस्ट १९०८ (मुझफ्फरपूर) |
| अशोक नंदीः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८८८ (कोमिला,बांगलादेश) |
| अशोक नंदीःमृत्यू-१६ ऑगस्ट १९०९ | मृत्यू - ६ जून १९०९ |
| मदनलाल धिंग्राः जन्म-१८८४ | जन्म-१८ फेब्रुवारी १८८३ (अमृतसर) |
| अनंत कान्हेरेः जन्म-१८९२ | जन्म-जाने.१८९२ (आयनी,रत्नागिरी) |
| सुशीलकुमार सेनः जन्म-(नोंद नाही) | जन्म - १८९२ (सिल्हेट,बांगलादेश) |
| बसंतकुमार विश्वासः जन्म-१८९३ | जन्म - ६ फेब्रुवारी १८९५ |
| बसंतकुमार विश्वासः फाशी-८ मे १९१५ | फाशी - ११ मे १९१५ |
| पंडित कांशी रामः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१३ ऑक्टो.१८८३ (अंबाला) |

| | |
|---|---|
| जतीन्द्रनाथ मुखर्जीः जन्म-(नोंद नाही) | जन्म-८ डिसेंबर १८७९ (नाडीया) |
| विष्णू गणेश पिंगळेः जन्म - १८८८ | जन्म - २ जानेवारी १८८८ |
| कर्तारसिंग सराबाः जन्म-(नोंद नाही) | जन्म-२४ मे १८९६ (लुधियाना) |
| निरेंद्रनाथ दासगुप्ताःफाशी-१६ नोव्हें.१९१५ | फाशी-२२ नोव्हेंबर १९१५ |
| नलिनीकांत बागचीः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८९६ (मुर्शिदाबाद,प.बंगाल) |
| गेंदालाल दीक्षितः जन्म-१८८८ | जन्म- ३० नोव्हेंबर १८८८ |
| गोपीमोहन साहाः जन्म- (नोंद नाही) | जन्म-१६ डिसेंबर १९०५ (हुगळी) |
| अल्लुरी सीताराम राजूः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८९७/९८ (विशाखापट्टणम) |
| अल्लुरी सी.राजूः वीरगती-६ मे १९२४ | वीरगती - ७ मे १९२४ |
| प्रमोद रंजन चौधरीः जन्म-(नोंद नाही) | जन्म - १९०४ (चितगांव) |
| रामप्रसाद बिस्मिलः जन्म-१८९७ | जन्म-११ जून १८९७ (शहाजहानपूर) |
| ठाकूर रोशनसिंगः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८९४ (शहाजहानपूर) |
| मोहम्मद बरकतुल्लाः जन्म-(नोंद नाही) | जन्म-७ जुलै १८५४ (भोपाळ) |
| मोहम्मद बरकतुल्लाः निधन-५ जाने.१९२८ | निधन-२७ सप्टेंबर १९२७ |
| जतींद्रनाथ दासः जन्म-(नोंद नाही) | जन्म-२७ ऑक्टो.१९०४ (कोलकता) |
| प्रभास बालः जन्म-(नोंद नाही) | जन्म-(धोरला,चित्तगांव,बांगलादेश) |
| भगवतीचरण व्होराः जन्म-जुलै १९०४ | जन्म- नोव्हेंबर १९०३ |
| शाळीग्राम शुक्लः जन्म-(नोंद नाही) | जन्म-(सिधी इतरा,जि.कानपूर,उ.प्र.) |
| शाळीग्राम शुक्लः मृत्यू-२ डिसें.१९३० | मृत्यू- १ डिसेंबर १९३० (कानपूर) |
| सुधीर गुप्ता(बादल): जन्म-(नोंद नाही) | जन्म- १९१२ (बिक्रमपूर,ढाका) |
| बाबू गेनू सैदः जन्म-१९०८ | जन्म - जानेवारी १९०८ |
| विनय कृष्ण बोसः जन्म-(नोंद नाही) | जन्म-११ सप्टेंबर १९०८ (बिक्रमपूर) |
| मल्लप्पा धनशेट्टीः जन्म-(नोंद नाही) | जन्म - १८९८ (सोलापूर) |
| हरिकृष्णः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१९१२ (घल्ला ढेर, जि.मर्दान) |
| दिनेश गुप्ताः जन्म-(नोंद नाही) | जन्म-६ डिसेंबर १९११ (बिक्रमपूर) |
| दिनेश गुप्ताः फाशी-८ जुलै १९३१ | फाशी - ७ जुलै १९३१ |
| प्रीतिलता वड्डेदारः जन्म-(नोंद नाही) | जन्म-५ मे १९११ (दालघाट,चित्तगांव) |
| अनाथबंधू पांजाः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१९१४ (जलबिंदू,मिदनापूर) |
| मृगेंद्रकुमार दत्तः जन्म-(नोंद नाही) | जन्म-२७ ऑक्टो.१९१५ (मिदनापूर) |
| मास्टर सूर्यसेनः जन्म-(नोंद नाही) | जन्म-२२ मार्च १८९४ (चित्तगांव) |

| | |
|---|---|
| चंपकरमण पिल्लेः निधन-१६ मे १९३४ | निधन - २६ मे १९३४ |
| मणींद्र बॅनर्जीः जन्म-(नोंद नाही) | जन्म - १९११ (बनारस, उ.प्र.) |
| मतिलाल मलिकः जन्म-(नोंद नाही) | जन्म - १९१२ (देवभोग, ढाका) |
| भाबिनी भट्टाचार्यः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१९१४ (जोयडेबपूर,ढाका) |
| मॅडम भिकाईजी कामाःमृत्यू-१२ ऑगस्ट | मृत्यू - १३ ऑगस्ट |
| सरदार उधमसिंगः जन्म-२८ डिसें.१८९९ | जन्म-२६ डिसेंबर १८९९ |
| शिरीषकुमार मेहताः जन्म - नंदूरबार | जन्म - १९२६ (नंदूरबार) |
| शिरीषकुमारः हौतात्म्य-१० ऑग.१९४२ | हौतात्म्य - ९ सप्टेंबर १९४२ |
| सरदारसिंह रे.राणाः जन्म-१२ एप्रिल १८७० | जन्म - १० एप्रिल १८७० |
| सरदारसिंह रे.राणाः निधन-१२ एप्रिल १९५७ | निधन - २५ मे १९५७ |
| डॉ.पांडुरंग खानखोजेः निधन-२८ जाने. | निधन - १८ जानेवारी |
| से.पांडुरंग बापटः जन्म-२२ नोव्हें.१८८० | जन्म - १२ नोव्हेंबर १८८० |
| पृथ्वीसिंह आझादः निधन-(नोंद नाही) | निधन - ५ मार्च १९८९ |
| दुर्गादेवी व्होराः निधन-४ ऑक्टो.१९९९ | निधन - १५ ऑक्टोबर १९९९ |
| इंद्रपाल (मंगतराम)ः जन्म - १९०६ | जन्म - ५ एप्रिल १९०५ |
| इंद्रपाल (मंगतराम)ः मृत्यू - १९४८ | मृत्यू - १३ एप्रिल १९४८ |
| सत्येंद्रनाथ बोसः जन्म-(नोंद नाही) | जन्म - जुलै १८८२ (मिदनापूर) |
| सोहन लाल पाठकः जन्म-(नोंद नाही) | जन्म - ७ जाने. १८८३ (अमृतसर) |
| बाबासाहेब नरगुंदकरः फाशी-१२ जून | फाशी - १२ जून / जुलै |
| सखाराम गणेश देऊस्करः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१७ डिसेंबर १८६९ (झारखंड) |
| सखाराम गणेश देऊस्करः मृत्यू-१९१२ | मृत्यू-२३ नोव्हेंबर १९१२ |
| बारींद्रकुमार घोषः जन्म-५ जुलै १८८० | जन्म - ५ जानेवारी १८८० |
| राम रखाः जन्म-(नोंद नाही) | जन्म-(सासोली,होशियारपूर,पंजाब) |
| प्रद्योतकुमार भट्टाचार्यः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१३ नोव्हेंबर १९१३ (मिदनापूर) |
| किशनसिंह गडगज्जः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८८६ (बिरिंग,जालंधर) |
| निर्मल जीवन घोषः जन्म-(नोंद नाही) | जन्म-५ जानेवारी १९१६ (हुगळी) |
| बटुकेश्वर दत्तः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८ नोव्हेंबर १९१० (बर्धमान) |
| वैकुंठ शुक्लः जन्म-जलालपूर | जन्म-१५ मे १९०७ (जलालपूर) |
| प्रफुल्ल चाकीः जन्म-१८८८ | जन्म - १० डिसेंबर १८८८ |
| बलवंतसिंहः जन्म-(खुर्दपूर,जालंधर) | जन्म - १८९९ (खुर्दपूर,जालंधर) |

| | |
|---|---|
| ज्योतिषचंद्र पालः जन्म-(नोंद नाही) | जन्म-१८९० (खोकसा,जि.नाडिया) |
| शचीन्द्रनाथ सन्यालःजन्म-१८९३(कलकत्ता) | जन्म-एप्रिल १८९३ (वाराणसी,उ.प्र.) |
| लोकनाथ बालः जन्म-१९०७ | जन्म - ८ मार्च १९०८ |
| लोकनाथ बालः मृत्यू-९ ऑक्टो.१९६४ | मृत्यू-४ सप्टेंबर १९६४ (कोलकता) |
| भाई परमानंदः जन्म-३० ऑक्टो.१८७५ | जन्म-४ नोव्हेंबर १८७६ (झेलम) |
| तारकेश्वर सेनगुप्ताःजन्म-१८ एप्रिल १९०५ | जन्म - १५ एप्रिल १९०५ |

वरीलप्रमाणे क्रांतिकारकांच्या जन्म-मृत्यूच्या तारखा व ठिकाण बदलण्यात आलेले आहे.

तसेच काही क्रांतिकारकांच्या नावांमध्ये दुरूस्ती केलेली आहे. जसे की, पूर्वीच्या ग्रंथातील वसंतकुमार विश्वास यांचे नाव या सुधारीत ग्रंथात 'बसंतकुमार' असे केले आहे. पंडित काशीराम जोशी यांचे नाव 'पंडित कांशी राम' असे केले आहे. जतीन मुखर्जी यांचे नाव 'जतीन्द्रनाथ मुखर्जी उर्फ बाघा जतीन' असे केले आहे. विनय कृष्ण बोस यांना 'बिनॉय बासू' म्हणून ओळखले जात, म्हणून तेही नाव त्यांचे नावापुढे लिहीले आहे. तसेच हरिकृष्ण यांचे नावापुढे 'हरी किशन तलवार' असे लिहीले आहे. प्रफुल्ल चाकी यांचे नावापुढे 'दिनेश चंद्र रॉय' असे लिहीले आहे. भाई कोतवाल यांचे नाव 'विठ्ठल लक्ष्मण कोतवाल (भाई कोतवाल)' असे लिहीले आहे.

त्याचप्रमाणे काही क्रांतिकारकांच्या जन्म-मृत्यूंच्या ठिकाणांमध्ये देखील स्पष्टता यावी, म्हणून गावाच्या नावापुढे जिल्ह्याचे अथवा राज्याचे नाव लिहीले आहे. जसे की, पूर्वीच्या ग्रंथात कित्तूरच्या राणी चन्नम्मा यांच्या मृत्यूचे ठिकाण केवळ बैलहोंगल असे लिहीले होते, ते आता 'बैलहोंगल,बेळगाव' असे लिहीले आहे. मंगल पांडे यांचे मृत्यूचे ठिकाण केवळ बराकपूर असे लिहीले होते, ते 'बराकपूर, पश्चिम बंगाल' असे लिहीले आहे. कुँवरसिंह यांचे मृत्यूचे ठिकाण जगदीशपूर असे होते ते 'जगदीशपूर, बिहार' असे लिहीले आहे. वांछीनाथन अय्यर यांचे जन्माचे ठिकाण शेनकोटा, त्रावणकोर, केरळ असे लिहीले होते, ते 'शेनकोटा, जि. टेंकासी, तमिळनाडू' असे लिहीले आहे. जतीन्द्रनाथ मुखर्जी यांचे

मृत्यूचे ठिकाण कटक, ओरिसा असे लिहीले होते, ते 'बालासोर, ओरिसा' असे लिहीले आहे. राजेन्द्रनाथ लाहिरी यांचे जन्मस्थान भडगा, पवना असे होते, ते 'मोहनपूर, जि. पबना, बांगलादेश' असे लिहीले आहे. हरिकृष्ण यांचे मृत्यूचे ठिकाण मेणवली असे होते, ते 'मियावली, पाकिस्तान' असे लिहीले आहे. चंपकरमण पिल्ले यांचे जन्मस्थान त्रावणकोर असे होते, ते बदलून 'तिरूवनंतपूरम, केरळ' असे लिहीले आहे. भाबिनी भट्टाचार्य यांचे फाशीचे ठिकाण ढाका असे होते, ते 'राजशाही, बांगलादेश' असे लिहीले आहे. हेमू कलानी यांचे जन्म-मृत्यूचे ठिकाण सक्कर असे होते, ते 'सुक्कूर' असे घेतलेले आहे. रासबिहारी बोस यांचे जन्मस्थान पालाटबिधानी असे होते, तेथे 'सुबलदहा, बर्धमान, पश्चिम बंगाल' असे लिहीले आहे. सरदारसिंह रेवाभाई राणा यांचे मृत्यूस्थान राजकोट असे होते, ते 'वेरावळ, गुजरात' असे केले आहे. वैकुंठ शुक्ल यांचे फाशीचे ठिकाण मोतीहारी तुरूंग असे होते, ते 'गया तुरूंग, बिहार' असे केले आहे. मनोरंजन सेनगुप्ता यांचे जन्मस्थान मदारीपूर असे होते, ते 'मदारीपूर, फरीदपूर, बांगलादेश' असे केले आहे. प्रफुल्ल चाकी यांचे मृत्यूचे ठिकाण मुकमाघाट असे होते, ते 'मोकामाघाट, जि. पाटणा, बिहार' असे केले आहे.

काही क्रांतिकारकांची जन्म-मृत्यूंच्या ठिकाणांची माहिती जुन्या ग्रंथांत दिलेली नव्हती, ती या सुधारीत आवृत्तीत नमूद केली आहेत. उदाहरणार्थ, योगी अरविंद घोष यांचे जन्मस्थान 'कलकत्ता' तर मृत्यूस्थान 'पुदुच्चेरी'. मदनलाल धिंग्रा यांचे जन्मस्थान 'अमृतसर, पंजाब'. मानवेन्द्रनाथ रॉय यांचे मृत्यूचे ठिकाण 'डेहराडून, उत्तराखंड'. पृथ्वीसिंह आझाद यांचे जन्मस्थान 'लालरू, मोहाली, पंजाब'. मनोरंजन सेनगुप्ता यांचे फाशीचे ठिकाण 'बालासोर, ओरिसा'. शचीन्द्रनाथ सन्याल यांचे मृत्यूचे ठिकाण 'गोरखपूर, उत्तर प्रदेश'. कालिपाद मुखर्जी यांचे फाशीचे ठिकाण 'ढाका, बांगलादेश'.

याशिवाय 'बॉम्बचे तत्त्वज्ञान' या परिशिष्टाची पार्श्वभूमी वाचकांना देणे गरजेचे होते. महात्मा गांधीजींनी 'दि कल्ट ऑफ दि बॉम्ब' या नावाने लिहीलेल्या

लेखाला क्रांतिकारकांनी 'दि फिलॉसॉफी ऑफ दि बॉम्ब' अर्थात 'बॉम्बचे तत्त्वज्ञान' हा प्रदिर्घ लेख लिहून उत्तर दिले. त्याची थोडक्यात माहिती लेखाच्या सुरूवातीला देण्यात आलेली आहे. की जी पूर्वीच्या ग्रंथात नव्हती.

'भारतात आलेले इंग्रज राज्यकर्ते' या परिशिष्टात पूर्वीच्या ग्रंथात इंग्रज अधिकाऱ्यांचे मराठी नाव दिलेले होते. या सुधारीत आवृत्तीमध्ये मराठी नावांपुढे त्यांचे इंग्रजी नाव देखील देण्यात आलेले आहे.

वरील सर्व बदल येथे विस्ताराने लिहावयाचे कारण की, संपादकाने मूळ ग्रंथात कोणताही बदल न करता तो पुन्हा प्रसिद्ध करावा असे साधारणतः मानले जाते. मात्र वरीलप्रमाणे काही बदल करणे गरजेचे होते. त्यामुळे ते करूनच, ही सुधारीत आवृत्ती प्रसिद्ध करण्यात आलेली आहे.

'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा' या पुस्तकातील १११ क्रांतिकारक, 'स्वातंत्र्यसंग्रामातील अंगार' मधील २० व 'स्वातंत्र्यसंग्रामातील अग्निशलाका' मधील १७ असे एकूण १४८ क्रांतिकारक होतात. मात्र कालीपाद मुखर्जी आणि बटुकेश्वर दत्त यांची माहिती दोनदा देण्यात आलेली होती. त्यामुळे या सुधारीत आवृत्तीत १४६ क्रांतिकारकांची फोटोंसह माहिती देण्यात आलेली आहे.

वरील तिनही ग्रंथांचे संपादन करून ते एकत्र करीत असताना माझ्या लक्षात आले की, ग्रंथात समाविष्ट १४६ क्रांतिकारकांशिवाय असंख्य स्वातंत्र्य सैनिकांनी भारतभूमीसाठी आपल्या प्राणांचे बलिदान दिलेले आहे. या हुतात्म्यांची देखील नावे व थोडक्यात माहिती या ग्रंथात देता येईल का? असा विचार माझ्या डोक्यात आला. त्यामुळे क्रांतिकारकांवरील प्रसिद्ध झालेली अनेक ग्रंथसंपदा मी धांडाळून पाहिली. अनेकांना त्याबाबत विचारले. खूप शोध घेतल्यानंतर Whos Who of Indian Martyrs हा ग्रंथ मिळाला. भारताचे उपपंतप्रधान व महाराष्ट्राचे सुपुत्र मा. यशवंतराव चव्हाण यांच्या पुढाकारातून साकार झालेल्या या ग्रंथाचे तीन खंड असून, त्यांपैकी पहिल्या खंडात १८५७ ते १९४७ या दरम्यान इंग्रजांविरूद्ध निरनिराळ्या प्रकारे लढताना हुतात्मा झालेल्या वीरांचा समावेश आहे. तर दुसऱ्या

खंडात भारताबाहेर इंग्रजांशी लढताना हुतात्मा झालेल्या स्वातंत्र्यसैनिकांचा आणि इंग्रजांखेरीज पोर्तुगीज, निजाम यांचे सैन्याशी लढताना प्राणार्पण करणाऱ्या गोवा, हैद्राबाद इत्यादी ठिकाणच्या हुतात्म्यांचा यात समावेश आहे. तर तिसऱ्या खंडात १८५७ पूर्वीच्या क्रांतिवीरांची माहिती देण्यात आलेली आहे.

या ग्रंथात मात्र केवळ Whos Who of Indian Martyrs या ग्रंथाच्या पहिल्या खंडातील म्हणजेच १८५७ ते १९४७ यादरम्यान हुतात्मा झालेल्या स्वातंत्र्यवीरांचा समावेश केलेला आहे. तसेच त्यांची माहिती देताना केवळ हुतात्म्यांचे नाव, त्यांचा जन्म आणि मृत्यू एवढीच माहिती दिलेली आहे.

याखेरीज अजून एक बाब माझ्या लक्षात आली की, क्रांतिकारकांची नावे व त्यांची माहिती मिळते मात्र अनेकांची छायाचित्रेच मिळत नाहीत. त्यामुळे पुन्हा एकदा विचारचक्र सुरू झाले, अखंड साधनांची शोधाशोध सुरू झाली. आणि पूर्वीच्या ग्रंथांत असलेल्या १४६ क्रांतिकारकांशिवाय ७०० हून अधिक क्रांतिकारकांची छायाचित्रे मिळाली. एवढ्या मोठ्या संख्येने क्रांतिकारकांची दुर्मिळ छायाचित्रे उपलब्ध होणे, ही मोठी गोष्ट असल्याने ग्रंथ मोठा झाला तरी चालेल पण ही सर्व छायाचित्रे या ग्रंथात समाविष्ट केलीच पाहिजे असा मी निश्चय केला.

याशिवाय 'क्रांतिशिरोमणी' चंद्रशेखर आझाद व सरदार भगतसिंग ही क्रांतिकारी चळवळीमधील सर्वांत प्रसिद्ध व्यक्तिमत्त्वे. यांच्या प्रेरणेनेच अनेक क्रांतिकारकांनी आपले आयुष्य देशासाठी बहाल केले. त्यामुळे चंद्रशेखर आझाद व भगतसिंग यांच्याशी संबंधित काही छायाचित्रे या ग्रंथात समाविष्ट केली आहेत. तसेच क्रांतिकारकांच्या स्मृतीस्थळांची देखील छायाचित्रे देण्यात आलेली आहेत.

हा ग्रंथ क्रांतिकारकांवरील एक परिपूर्ण संदर्भ ग्रंथ व्हावा, यासाठी जेवढी माहिती देता येईल तेवढी यात देण्याचा मी कसोशीने प्रयत्न केला.

आता या मूळ ग्रंथांचे लेखक ‘दुर्गमहर्षी’ प्रमोद मारुती मांडे यांचा येथे थोडक्यात परिचय करून देणे गरजेचे आहे. प्रमोद मांडे हे महाराष्ट्रातील उत्तम वक्ते, जेष्ठ विचारवंत, प्रखर देशभक्त तसेच अनेक विषयांचे ज्ञान आत्मसात करण्याची उत्सुकता असणारे आणि अनेक युवकांचे स्फुर्तिदाते होते. ‘अत्यंत साधी राहणी व उच्च विचारसरणी’ याच तत्वाने ते कायम वागत आले. माझ्यासारख्या अनेक युवकांना त्यांनी विचारांची योग्य दिशा दिली. आम्ही सर्वजण त्यांना आदराने ‘भाऊ’ म्हणायचो. ते माझे प्रेरणास्थान आणि स्फूर्तीस्थान होते.

प्रमोद मांडे उर्फ भाऊ यांनी जवळपास ३५ वर्षे भारतभर प्रवास करून किल्ले व ऐतिहासिक वास्तूंचा शोध घेतला. त्यावरून सन २००७ मध्ये त्यांनी महाराष्ट्रातील जवळपास ३९१ किल्यांचा समावेश असणारे ‘गड किल्ले महाराष्ट्राचे’ हे पुस्तक प्रसिद्ध केले. आणि सन २०१४ मध्ये १११ क्रांतिकारकांचा समावेश असणारे ‘स्वातंत्र्य संग्रामातील समिधा’ या ग्रंथाची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध केली. हे दोनही ग्रंथाचे टायपिंगचे काम मांडे सरांच्या मार्गदर्शनाखाली मी माझ्या ऑफिसमध्ये पूर्ण केले. यापुढेही अनेक कामे करायचे मांडे सरांच्या मनात होते. मात्र दि. १७ ऑक्टोबर २०१७ रोजी सकाळी ११.१५ वा. कॅन्सरसारख्या दुर्धर आजारामुळे आदरणीय मांडे सरांचे दुःखद निधन झाले.

मांडे सरांनी लिहून ठेवलेल्या भारतातील किल्ल्यांच्या नोंदींवरून व काही फोटोंवरून, तब्बल अडीच वर्षे दिवसरात्र एक करून सन २०२० मध्ये मी व श्री. चेतन घाडगे यांनी मिळून “FORTS & PALACES IN INDIA : Encyclopedia of 4000+ Forts & Palaces across India” या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. २६ राज्ये, ६ केंद्रशासित प्रदेश व ५२१ जिल्ह्यांमधील ४०८८ किल्ल्यांचा या ग्रंथामध्ये समावेश करण्यात आलेला आहे. या ग्रंथात १२८२ रंगीत छायाचित्रे, ३३ नकाशे, सर्व राज्यांसह भारताचे भौगोलिक वर्णन, किल्ल्यांचे अक्षांश-रेखांश-समुद्रसपाटीपासूनची उंची दिलेली आहे. याशिवाय किल्ल्याची थोडक्यात माहिती, त्यावरील वास्तू, त्याचा थोडक्यात इतिहास तसेच किल्ल्याच्या जवळपासची

तसेच जिल्ह्यामधील प्रेक्षणीय ठिकाणे देखील देण्यात आलेली आहेत. त्याचप्रमाणे हडप्पा-मोहेंजोदरो येथपासून भारताच्या गौरवशाली परंपरेचे प्रतिक असणाऱ्या किल्ल्यांचे वर्णन या ग्रंथात दिलेले आहे. ऋग्वेद, मनुस्मृती, पुराणे, रामायण, महाभारत, कौटिल्य रचित अर्थशास्त्र या व अशा विविध ४३ हून अधिक प्राचीन ग्रंथांमध्ये असलेल्या किल्ल्यांबाबतची माहिती देखील या ग्रंथात स्वतंत्रपणे दिलेली आहे. असा हा अमूल्य-संदर्भग्रंथ प्रत्येकाच्या संग्रही असायला हवा. भारतातील किल्ल्यांवरील दुर्गकोष व्हावा, ही आमच्या गुरूची इच्छा आम्ही पूर्ण केली. याचे फार फार समाधान वाटते.

यानंतरही स्वस्थ न बसता, मांडे सरांची इतरही काही अपूर्ण कामे पूर्ण करण्याच्या खटपटीत मी लागलो. मांडे सरांची काही व्याख्याने माझ्याकडे होती, ती युट्यूबवर टाकली. क्रांतिकारकांवरील त्यांची ३ पुस्तके उपलब्ध होत नव्हती ती पुर्नप्रकाशित करण्याबाबत काम सुरू केले. आणि क्रांतिकारकांवरील हा ग्रंथ आज नव्या रुपात प्रकाशित होत आहे, याचा आनंद आहे.

सुरूवातीला, या ग्रंथाचे नाव 'कथा क्रांतिकारकांची' असे ठेवावे असा विचार होता. मात्र नंतर मांडे सरांचे मुख्य पुस्तक 'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा' होते म्हणून तेच नाव ठेवावे असा विचार आला. मांडे सरांच्या ३ ग्रंथांमधील माहितीशिवाय क्रांतिकारकांची इतरही माहिती व फोटो या ग्रंथात समाविष्ट झाल्यामुळे, या ग्रंथास 'आझादी के दिवाने' हे नाव ठेवावे असा विचार मनात आला, श्री. राहूल पापळ यांनीच तसे सुचविले. प्रसिद्ध उर्दू शायर सर्फराज नवाज जंगबहादुर मदहोश बिलग्रामी यांनी मांडे सरांच्या क्रांतिकारकांच्या प्रदर्शनाकरीता हे नाव सुचविले होते. आणि मांडे सरांनादेखील हे नाव फार आवडत असे. त्यामुळे ग्रंथाचेही हेच नाव ठेवावे असा निश्चय केला.

ग्रंथाचे मुखपृष्ठ श्री. राहूल पापळ यांच्या कल्पनेतून साकार झाले. ग्रंथनिर्मितीच्या सर्वच कार्यात कायम पाठिशी राहणारे श्री. राहूल पापळ व श्री. चेतन घाडगे यांचे आभार मानणे येथे गरजेचे आहे. त्यांचे सहकार्य नसते तर हे

कार्य पूर्णत्वास जाणे कठिण झाले असते. ग्रंथाची रचना, शब्दांचा फॉंट इत्यादीबाबत मार्गदर्शन करणारे श्री. एन. शहाजी सरांचे विशेष आभार. मानसी वडके हिने पुस्तकाचे निर्मितीचे कामात बरीच मदत केल्याने हे पुस्तक लवकरात लवकर प्रसिद्ध करणे शक्य झाले, त्यामुळे तीचे आभार मानने औचित्याला धरून होईल.

याशिवाय मा. राम कुतवळ, मा. दीपक पायगुडे, मा. बाळासाहेब रूणवाल, सत्यजित जाधव, आनंदराव शिंदे, सतिश वाघमारे, हेमंत लिमये, निखील आरसिद्ध, टी.जे. जमादार, अमित गोगावले, संदिप रेमजे, सुहास भेगडे, राजकुमार ढमाले, शिवाजी निंबाळकर, सुरेश निंबाळकर, ज्ञानेश्वर कोळेकर यांचेही आभार.

वडवानल प्रतिष्ठान, लोकसेवा ग्रुप, पुणे व्हेंचर्स, झुंजार शिलेदार सेवा समिती, शिवजयंती उत्सव समिती उस्मानाबाद, गड किल्ले सेवा समिती, संस्कृती संवर्धन संस्था, गडवाट, सागरमाथा, शिवाजी ट्रेल, सह्याद्री प्रतिष्ठान तसेच प्रमोद मांडे सरांना आदर्श मानणाऱ्या सर्वच संस्थांचे व त्यांच्या सदस्यांचे आभार.

भारतभूमीसाठी कोणताही स्वार्थ मनी न बाळगता निरपेक्ष बुद्धीने सर्वस्व अर्पण करणाऱ्या शूरवीरांची माहिती लोकांपर्यंत यावी, यासाठी माझे गुरू आदरणीय प्रमोद मांडे यांनी आपल्या पैशांसह सर्वस्व अर्पण केले. कशाचाही मोह न बाळगता त्यांनी भारताचा उज्ज्वल इतिहास सर्वांपुढे येण्यासाठी अनेक हालअपेष्टा सहन केल्या. ते मी गेल्या अनेक वर्षांपासून पाहत आलो आहे.

अधिकाधिक क्रांतिकारकांचे कार्य, त्यांचे चरित्र लोकांपुढे यावे यासाठीच मी एवढे मोठे धाडस केले असून, यातील माहिती जास्तीत जास्त निर्दोष व परिपूर्ण व्हावी असाच माझा प्रयत्न होता. मात्र त्याहूनही यात काही त्रुटी राहू शकतात. क्रांतिकारकांची पुरेशी माहिती उपलब्ध नसताना, त्यामध्ये अनेक मतमतांतरे असताना, जी सर्वमान्य माहिती आहे ती येथे घेण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच या ग्रंथात काही त्रुटी असल्यास, त्या मला जरूर सांगा, अशीही मी विनंती करीत आहे.

भारताच्या स्वातंत्र्यास ७५ वर्षे पूर्ण होत असून त्यानिमित्ताने हा ग्रंथ साकार होत आहे, त्याचा विशेष आनंद आहे.

अखेर, क्रांतिकारकांनी अन्यायाविरूद्ध प्रज्वलित केलेली क्रांतीची ही ज्योत भारतीयांच्या मनामनांत सतत तेवत राहो, अशी मनोकामना व्यक्त करतो.

पुणे, महाराष्ट्र.
दि. ९ ऑगस्ट २०२१ (क्रांतिदिन)

**– अनिकेत अंकुश यादव**

## ✻ लेखकाचे मनोगत ✻
### (‘स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा’ या ग्रंथामधून)

आम्ही जन्माला यायच्या आधीच टोपीकरसाहेब देश सोडून पळालेला (नाही तर काही खरे नव्हते त्याचे) हा गोरा साहेब सिनेमांतून पाहिलेला. गांधीबाबांनी इंग्रजांना कसे पळवून लावले हे हजारपेक्षा जास्त वेळा तरी आम्ही आजोबांच्या तोंडून ऐकलेले. स्वातंत्र्यलढ्याशी येत असलेला हा आमचा घनिष्ठ संबंध आजोबांच्या मृत्यूनंतर संपला.

कळायला लागल्यापासून देशासाठी काहीतरी करावे असे वाटायचे. देशप्रेम म्हणजे नेमके काय? याचे आकलन होत नव्हते. शाळेत असताना इंग्रजी भाषेचे आणि आमचे कधीच पटले नाही. (बहुधा आमच्या देशप्रेमाचाच तो परिणाम होता.) त्यामुळे अनेकवार शिक्षकांकडून पाठ मऊ करून घेतली. अशा वेळी शिक्षक मला सत्याग्रहींवर बेछूट लाठीमार करणाऱ्या गोऱ्या सोजिरासारखे भासायचे आणि आम्ही एवढ्या निष्ठेने मार खात असताना वर्गातली मुले मात्र फिदीफिदी हसायची. एवढी मानहानी सोसूनही आम्ही आमच्या निष्ठेवर ठाम राहिलो. वर्षानुवर्षे हा अन्याय आम्ही सहन केला. काही वेळा तर एकेका इयत्तेत दोन-तीन वर्षे बसलो. पण शिक्षकांना काही दया आली नाही. अखेर कंटाळून कंटाळून शाळेने आम्हांला वरच्या वर्गात ढकलत ढकलत एकदाचे शाळेबाहेर काढले. मग आम्हीही जेलमधून सुटल्यासारखे आनंदलो. आम्ही सुटल्याबद्दल शिक्षकांनाही खूप आनंद झाला. या आनंदाप्रीत्यर्थ शिक्षकांनी पेढे वाटल्याचे नंतर माझ्या कानांवर आले. एस्.एस्.सी. पास इंग्रजीशिवाय, हा शाळेचा दाखला मला आजही स्वातंत्र्यसैनिकाला मिळालेल्या ताम्रपत्राइतकाच महत्त्वाचा वाटतो.

**दुश्मन की गोलियों का हम सामना करेंगे।**
**आझाद हैं हम, आझाद ही रहेंगे।**

थोर क्रांतिकारक चंद्रशेखर आझादांच्या या शेराप्रमाणे आम्ही पण आझाद राहायचे ठरवले. घरच्या आणि बाहेरच्यांचा ससेमिरा चुकवत चुकवत आम्ही आजतागायत कॉलेजरूपी जेलमधे कधी अडकलो नाही. पण जेलबाहेर राहून काहीतरी राष्ट्रकार्य केले पाहिजे या जाणिवेने देशभक्तीचे चित्रपट पाहायला लागलो. जागृती,

उपकार, हकीकत, शहीद हे चित्रपट अनेकवार पाहिले. मनोजकुमारच्या '**शहीद**' मुळे एक वेगळी दिशा मिळाली. नकळत भगतसिंगांकडे ओढला गेलो. भगतसिंग, राजगुरु, सुखदेव, चंद्रशेखर आझाद यांच्या भोवतीच घुटमळत राहिलो. दुसरे काही आवाक्यात येतच नव्हते. शाळेत क्रांतिकारकांची चरित्रे शिकायला मिळाली नाहीत. बाहेरही मिळाली नाहीत. त्यामुळे आमच्या ज्ञानाचे दरवाजे चित्रपटगृहातच उघडत होते. बाहेर विचारावे तर एकाही टोपीवाल्याने आम्हांला थांगपत्ता लागू दिला नाही. त्यातून आमचे वास्तव्य पुण्याच्या पूर्व भागात. तिथे तर सगळेच **हरी.. हरी..** ! जे जे काही (वयाने) मोठे झाल्यावर करायचे ते-ते लहानपणीच सुरू केलेले. घरची स्थिती बेताची. त्यामुळे आमची ज्ञानसाधना ठप्प झालेली. आई नेहमीच म्हणायची, **मुडद्या ! कुठंतरी चिकट जरा, घराला हातभार लागंल. नुसता टोणगा आहे टोणगा !** मग काय ! आम्ही जिथे जमेल तिथे चिकटायचो. पाचपंचवीस ठिकाणी चिकटून झाले. बऱ्याच वेळा आम्ही चिकटलो तरी झुरळासारखे झटकले जायचो. पण चिकाटी काही सोडली नाही. शेवटी कौशल्याने एकदाचे **टेल्को** ला चिकटलो ते आजतागायत.

अशा रीतीने सायडिंगला पडलेली गाडी मुख्य मार्गावर आली. नुसती आली नाही तर **नवी दिल्ली** च्या दिशेने धावू लागली. मार्च १९८१ मध्ये हुतात्मा भगतसिंगांची ५० वी पुण्यतिथी नवी दिल्लीमध्ये साजरी करण्याचे ठरले. त्या समारंभासाठी पुण्यातून ज्येष्ठ स्वातंत्र्य सैनिक डॉ. नरेंद्र चिल्लाळ यांच्याबरोबर निघालेल्या जथ्यात आम्हीही सामील झालो. या समारंभात साऱ्या हिंदुस्थानातून अनेक **क्रांतिकारक** आले होते. त्यांच्या दर्शनाचे खूप अप्रूप वाटले. तिथे मांडलेल्या क्रांतिकारकांच्या चित्रप्रदर्शनाने खूप भारावून गेलो. मुख्य मंडपातल्या भाषणांत त्यावेळचे गृहमंत्री ग्यानी झैलसिंग यांचे भाषण खूपच रंगले. ग्यानीजींनी आपल्या ओघवत्या भाषेत मधून मधून शेरोशायरीची लयलूट करीत सर्वांना मंत्रमुग्ध करून सोडले. वाटले, ग्यानीजींचे भाषण कधी संपूच नये. तेवढ्यात इंदिरा गांधी यांचे आगमन झाले. ग्यानीजी बोलता बोलता मधेच थांबले. पण इंदिराजी जोरात म्हणाल्या, **ग्यानीजी आप बात कीजिए, मुझे भी सुननी है।** तिथून पुढे अर्धा तास श्रोतृवर्ग त्या वीररसाच्या अमृतवर्षावात न्हाऊन निघाला. त्या झपाटलेल्या अवस्थेतच पुण्यात परत आलो.

आपल्याच मस्तीत असताना हातात पडले मृणालिनी जोशींचे **इन्कलाब**. हावरटासारखा फडशा पाडला. **इन्कलाब** मुळे क्रांतिकारकांच्या चरित्राकडे बघण्याचा एक वेगळाच दृष्टिकोन तयार झाला. वसंत पोतदारांचे **वंदे मातरम्** ही नुसती वाचायची नव्हती तर ती इतरांना सांगितले पाहिजेत, हे नव्याने जाणवले. जमेल तसा प्रयत्न करीत होतो. वि. श्री. जोशींचे **मृत्युंजयांचा आत्मयज्ञ** हे पुस्तक हाताला लागले. **क्रांतिकारकांवर लिहिलेले अप्रतिम पुस्तक** म्हणूनच त्याचा उल्लेख केला पाहिजे. मुळात मराठीत या विषयावर फार थोड्या लोकांनी लिहिण्याचे प्रयत्न केले. त्यांतही वि. श्री. जोशींनी प्रचंड लिखाण करून आमच्यासारख्यांवर न फिटणारे उपकारच केले आहेत.

अनेकांशी या विषयावर गप्पा मारून, चर्चा करून मिळेल तशी माहिती गोळा करीत होतो. अनेक वेळा स्वातंत्र्यलढ्यावर बोलताना धर्म, जात, पंथ, पक्ष या चौकटींबाहेर पडून बोलणारे मात्र हाताच्या बोटांवर मोजता येतील एवढेच सापडले. यातून काही माहिती पदरात पडण्यापेक्षा हे कसे चुकले? ते कसे चुकले? हेच ऐकावे लागायचे. टीकाकारांची टीका कित्येकदा राष्ट्रकार्याकडे डोळेझाक करून व्यक्तिगत जीवनात डोकवायची. स्वातंत्र्यलढा कसा लढला गेला? तो का लढावा लागला? हे मात्र कोणी सांगत नव्हते. पुन्हा मधून मधून तसे पाहिले तर इंग्रजांचे राज्य चांगले होते, हेही ऐकायला मिळायचे. गुंता सुटण्यापेक्षा गुंता वाढतच गेला.

इंग्रजांचे राज्य चांगले होते हे म्हणणे अज्ञानाचे द्योतक आहे. डलहौसीने इथली अनेक राज्ये बुडवली. त्यासाठी त्याने अनेक कारणे पुढे केली. वारसाहक्काच्या बाबतीत मुलगाच वारस पाहिजे, ही अट घातली. मुलगी चालणार नाही म्हणणाऱ्या डलहौसीला इंग्लंडची व्हिक्टोरिया राणी चालत होती. नागपूरच्या भोसल्यांना लुबाडून नंतर उभा केलेला ऐंशी लाख पौंडांचा भोसला फंड १८५७ नंतर अचानक गडप केला. अमृतराव पेशव्यांनी देवस्थानासाठी ठेवलेला पैसाही असाच लुबाडला. शिक्षणाच्या नांवाखाली राजा रणजितसिंहांच्या मुलाला विलायतेला पाठवून त्याला ख्रिश्चनधर्माची दीक्षा दिली. सरकारी पातळीवरून मिशनऱ्यांना पाठिंबा देऊन बाटवाबाटवी केली. इंग्रज अधिकाऱ्यांच्या वार्षिक उत्पन्नाचे दाखलेच त्यांची भ्रष्टाचारी वृत्ती दाखवते. पैशाच्या जोरावर बाळगलेल्या हिंदुस्थानी बायकांपासून झालेल्या अनौरस संततीला नोकऱ्यांमध्ये प्राधान्य देणारी वशिलेबाजीची वृत्ती वाढली. उत्तम प्रतीचे कापड तयार

करणारा व निर्यात करणारा संपूर्ण उद्योग अत्यंत वाईट पद्धतीने नष्ट करून या देशात आर्थिक अवनतीचा पाया इंग्रजांनी घातला. याशिवाय ज्ञानदानाच्या नावांखाली केलेली बुद्धीची बाटवेगिरी तर वेगळीच. बुद्धीच्या बाटवेगिरीने निर्माण झालेली **इंग्रजांची पिलावळ** आजही इंग्रजांच्या सुसंस्कृतपणाचा कंठशोष करतेय. मुळात युरोपियन राष्ट्रे कधीच सुसंस्कृत नव्हती व आजही नाहीत. देश सोडतानाही हिंदु-मुसलमान झगडा लावून भारत-पाकिस्तान निर्माण करूनच ते गेले. इथेच नाही तर जगभर त्यांनी हाच धिंगाणा घातला. इजिप्त-सुदान, इस्रायल-पॅलेस्टाइन, उत्तर आणि दक्षिण आयर्लंड ही उदाहरणे बोलकी आहेत.

१७५७ च्या प्लासीच्या लढाईनंतर हिंदुस्थानात परकीय तुर्क राजवटीबरोबर गोव्यातल्या पोर्तुगीजांसारखे इंग्रजही शिरले. फ्रेंचांनीही बस्तान बसविले. १८१८ मध्ये मराठ्यांच्या राज्याचा शेवट करून इंग्रजांनी सत्ता वर्चस्वात फ्रेंच, पोर्तुगीज आणि अगोदरपासून ठाण मांडून बसलेल्या तुर्कांवर कुरघोडी केली. हिंदुस्थानच्या मोठ्या भूभागावर कब्जा मिळवून या सुवर्णभूमीची मन मानेल तशी लूट केली. १७५७ ते १८१५ या कालखंडात हिंदुस्थानच्या संपत्तीमधून १००० दशलक्ष पौंड एवढी रक्कम इंग्लंडच्या बँकेमध्ये स्थलांतरित झाली. विल्यम डिग्बीनेच हे लिहून ठेवले आहे.

अशा या परकीय आक्रमकांशी प्रदीर्घ काळ संघर्ष करून आपली अस्मिता आणि धर्म टिकवून स्वातंत्र्य मिळविणारे एकमेव राष्ट्र म्हणजे हिंदुस्थान. युरोपियन राष्ट्रांकडून स्वातंत्र्य मिळविणाऱ्या हिंदुस्थानाशिवाय एकाही राष्ट्राला स्वतःची अस्मिता, संस्कृती आणि धर्म टिकविता आला नाही. अनेक देशांतल्या प्राचीन संस्कृत्या या सत्तापिपासू आणि रक्तपिपासू, धर्मांध युरोपियनांनी नष्ट केल्या. मध्य आणि दक्षिण अमेरिकन देश, अमेरिका, कॅनडा, आफ्रिकन राष्ट्रे, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलँड ही ठळक उदाहरणे आहेत.

प्रथम तुर्क आक्रमकांविरुद्ध आणि नंतर युरोपियन आक्रमकांविरुद्ध सतत पराकोटीचा संघर्ष करून हिंदुस्थानने स्वातंत्र्य मिळविले. त्यासाठी देशाला अपरिमित हानी सोसून मोठी किंमत मोजावी लागली. या प्रदीर्घ काळ चाललेल्या स्वातंत्र्यसमरामध्ये अनेक देशभक्तांच्या घरादारांची आणि संसाराची राखरांगोळी झाली. अनेकांनी आजन्म कारावास भोगला. क्रांतिकारकांनी आपल्या प्राणाच्या समिधा स्वातंत्र्यसमरात अर्पण केल्या. कित्येकांना देश सोडून परागंदा व्हावे लागले. तर कित्येकांनी विजनवासात

दिवस कंठले. विविध मार्गांनी लढल्या गेलेल्या या स्वातंत्र्यसमरात देशभक्तांनी, क्रांतिकारकांनी आपल्या प्रखर राष्ट्रनिष्ठेने, जाज्वल्य राष्ट्रभक्तीने, रोमहर्षक पराक्रमाने, अत्यंत हालअपेष्टा सोसून हिंदुस्थान स्वतंत्र केला. ज्या दिवशी गोव्यातून पोर्तुगीजांच्या सत्तेचे पाऊल उखडले गेले त्या दिवशी हिंदुस्थान खऱ्या अर्थाने स्वतंत्र झाला (इ.स. १९६१).

युरोपियनांनी हिंदुस्थानात जोपासलेल्या विषवृक्षाची फळे जागोजाग मूळ धरून आहेत. या विषप्रवृत्तीची वाढ रोखण्यासाठी तत्कालीन घटनांचे, क्रांतिकारकांच्या विचारांचे, त्यांच्या त्यागाचे स्मरण राहावे म्हणून आम्ही, **'आझादी के दीवाने'** या क्रांतिकारकांच्या रंगीत तैलचित्रांच्या माहितीपूर्ण प्रदर्शनाचा प्रकल्प राबवीत आहोत. या प्रदर्शनाला पुणे, भोसरी, तळेगाव, अमरावती, कोल्हापूर, सातारा, सोलापूर, वर्धा, हैद्राबाद इत्यादी ठिकाणी उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला. यातील असलेली काही कमतरता दूर करून हा प्रकल्प पूर्णत्वाकडे नेण्याचे प्रयत्न चालू आहेत.

या प्रदर्शनाला, **आझादी के दीवाने** असे अर्थपूर्ण नांव प्रसिद्ध उर्दू शायर सर्फराज नवाज जंगबहादुर मदहोश बिलग्रामी यांनी सुचविले. रंगीत तैलचित्रे महामुनींच्या गिरीशने चितारलेली आहेत. सुंदर अक्षरशिल्पे घाटेंच्या सुनीलने काढली आहेत. हगवणेंच्या राजूने सुंदर हस्ताक्षरांत क्रांतिकारकांची माहितीपत्रके लिहिली. प्रदर्शनाच्या उभारणीसाठी धावपळ करणारा रावांचा मंगेश, अडचणीच्या प्रसंगी मदतीचा हात देणारे मनोहर तांबडे, दत्तू सावंत, इस्माईल अत्तार, अविनाश आवटे, अभिनेते नाना पाटेकर, गोपाळराव चांदोरकर यांचे आभार मानणे उचित ठरेल. आपल्या उद्योगात व्यस्त असूनही कधीही कुठल्याही मदतीला होकार देणारा कुतवळांचा राम आमच्या पाठीशी लक्ष्मणासारखा उभा आहे.

अजित गुप्ते, गुलाबराव सपकाळ, राजू डोंगरे, विनोद पावशे, श्याम अडसूळ, वीरेंद्र ठाकूर, नरेंद्र शेलार, आनंदराव शिंदे, विश्वास फडके, प्रदीप भोसले, राजेंद्र वडके, मारुती कड, ओमप्रकाश शर्मा, विलास येवलेकर, हरी प्रधान, हरगोविंद नरीयाणी, कु. अपर्णा डिंबळे, सुरेंद्र चोळकर, भरत डोरले, सुनील ननावरे, सौ. लेस्ली जेकब, रिजनल डायरेक्टर, इंडियन कौन्सिल फॉर कल्चरल रिलेशन, हैद्राबाद इत्यादी सहकाऱ्यांची साथ मोलाची ठरली आहे.

या प्रदर्शनास अनेक मान्यवरांनी भेटी दिल्या. त्यांत माननीय मुख्यमंत्री मनोहर जोशी, तसेच मंत्रालयातले स्वातंत्र्यसैनिक उच्चाधिकार समितीचे सदस्य सचिव राजाभाऊ झरकर यांनी या विषयावर पुस्तक व्हावे अशी इच्छा माझ्याशी बोलताना व्यक्त केल्यामुळे आणि गुलाबराव सपकाळ यांनी पाठपुरावा केल्याने या पुस्तकाला मूर्तस्वरूप येऊ शकले. शामकांत माळवदे यांनी आपली व्यावसायिकता पूर्णपणे बाजूला ठेवून हे पुस्तक छापण्यास घेतले, याबद्दल त्यांचे आभार मानणे गैर ठरणार नाही. श्री. मिलिंद मोघे, श्री. मोहन रानडे, श्री. प्रेम वैद्य यांचे प्रोत्साहन आणि वेळोवेळी मिळालेले मार्गदर्शन यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे मी माझे कर्तव्य समजतो. **गाथा बलिदाना**ची या, **लोकसत्ता** मधील सदरातून क्रांतिकारकांचा इतिहास सर्वदूर पोहोचविणारे माझे उरण येथील मित्र श्री. सुधाकर पाटील यांचेही आभार मानणे औचित्याला धरून होईल. टेल्कोच्या सामाजिक बांधिलकीमुळे आमची जी जडणघडण झाली त्या टेल्कोचे स्वर्गीय सुमंत मुळगांवकर यांचे ऋण कधीही न विसरण्याजोगे आहेत.

देशासाठी निरपेक्ष बुद्धीने सर्वस्व अर्पण करणाऱ्या आणि प्रसंगीं प्राणार्पण करणाऱ्या क्रांतिकारकांवरील अपार श्रद्धेने त्यांचा पराक्रम, त्याग आणि कार्य जास्तीत जास्त लोकांपर्यंत श्रद्धेने पोहोचवावे म्हणून हा प्रयत्न केला आहे. त्यामुळे या पुस्तकात काही चुका आढळल्या तर त्या माझ्याच चुका आहेत असे समजून वाचकांनी मला क्षमा करावी, आणि त्या चुका माझ्या निदर्शनास आणून सुधारण्याची संधी द्यावी, ही विनंती.

**– प्रमोद मारुती मांडे**



***

## ✻ दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने ✻

### (‘स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा’ या ग्रंथामधून)

स्वातंत्र्य संग्रामातील समिधा या पुस्तकामधील माहितीचा उपयोग अनेक शिक्षकांनी आणि विद्यार्थ्यांनी केला. हा या पुस्तकाचा सन्मानच म्हणावा लागेल. हिंदुस्थानचा स्वातंत्र्य लढा लढताना अनेक क्रांतिकारकांनी रोमहर्षक पराक्रम केला आहे. त्यांचे कार्य, त्यांची चरित्रे अलौकिक असून ती सर्वांनाच प्रेरणादायी आहेत. आज झपाट्याने होत चाललेले नैतिकतेचे, राष्ट्रभक्तीचे अधःपतन रोखण्यासाठी या क्रांतिकारकांच्या धैर्याचा, बलिदानाचा, जाज्वल्य राष्ट्रनिष्ठेचा आदर्श तरुण पिढीसमोर मार्गदर्शक ठरू शकेल.

आमच्या स्वातंत्र्यासाठी ज्यांनी बलिदान केले, आपले सर्वस्व उद्ध्वस्त करून पराकोटीचा त्याग केला अशा या क्रांतिरत्नांच्या ऋणातून अंशतः तरी मुक्त होण्याचा प्रयत्न करण्याचे समाधान मला लाभत आहे.

पहिल्या पुस्तकातील वृत्तांतात किरकोळ भर घालून ती वेगळ्या रंगरूपात अनेक रेखाचित्रांसहीत समजावून वाचकांच्या समोर ठेवण्यात मला आनंद वाटत आहे. गेल्या अनेक वर्षांच्या प्रयत्नांतून अनेक क्रांतिकारकांवर स्वतंत्र पुस्तक करण्याइतपत माहिती गोळा झाली आहे. ती सवडीने वाचकांच्या समोर सादर करण्याच्या प्रयत्नात मी आहेच. या पुस्तकासाठी श्री. आनंदराव शिंदे, श्री. विकास पाटकर, श्री. नितीन रासने, श्री. मनोहर इंगोले, श्री. दत्ता प्रभू, श्री. विश्वास फडके, श्री. मनोहर तांबडे यांचे बहुमोल सहाय्य लाभले.

पुस्तकातील रेखाचित्रे व मुखपृष्ठ पुन्हा नव्याने गिरीश महामुनी यांनी काढून दिली तर राजेंद्र हगवणेने प्रुफे तपासली. पुस्तकाची तांत्रिक बाजू मंगेश राव यांनी सांभाळली. अक्षरजुळणीची बाजू नरेश राव यांनी पाहिली. अनेक लेखांची कात्रणे माझ्या निदर्शनास आणणारा राजीव डोंगरे, सुंदर हस्ताक्षरात मजकूर लिहून

देणारा सुनील घाटे, पाठपुराठा करणारे विनोद पावशे, अजित गुप्ते, महत्त्वाचा सल्ला देणारे श्री. विजय देवधर, श्री. हरी नरके यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानने उचित ठरेल.

या पुस्तकाच्या निर्मितीसाठी सातत्याने पाठपुरावा करून त्यासाठी चटकन आर्थिक पाठबळ भक्कमपणे उभी करणारे श्री. राम कुतवळ, वडवानल प्रतिष्ठानाचे अध्यक्ष यांच्या ऋणात राहणेच योग्य ठरेल.

क्रांतिवीर नागनाथअण्णा नायकवडी, क्रांतिअग्रणी जी.डी.लाड (बापू), मा. राम शेवाळकर, मा. प्र.ल.गावडे, मा. प्रेम वैद्य, मा. आर.बी.शिंगटे, मा. मिलिंद मोघे, मा. गुलाबराव सपकाळ यांनी पाठीवर दिलेली कौतुकाची थाप आणि त्यांच्या प्रोत्साहनामुळेच या पुस्तकांचा प्रपंच मांडणे मला शक्य झाले यांचाही मी आभारी आहे.

**– प्रमोद मारूती मांडे**

***



## ✻ तिसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने ✻

### (‘स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा’ या ग्रंथामधून)

भारताच्या स्वातंत्र्य लढ्यातील सशस्त्र क्रांतिकारकांच्या आठवणी आणि इतिहास झपाट्याने पुसट होत आहे. त्यांचा त्याग, त्यांचे बलिदान, त्यांचा दुर्दम्य आशावाद विसरला जात आहे. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर या क्रांतिकारकांवर सरकारने दात धरला. क्रांतिकारक आणि त्यांच्या कुटुंबियांची मानहानीकारक अवहेलना झाली. त्यांना प्रचंड मनस्ताप सोसावा लागला. त्यांची अक्षरशः कुचंबणा झाली. यांत भगतसिंहांचा परिवार, सुखदेव यांचा परिवार, बटुकेश्वर दत्त यांचे जीवन, आझादांचे असीम कार्य तसेच जगराणीदेवी या, आझादांच्या मातेच्या हालअपेष्टा अशी अनेक उदाहरणे आपल्यांसमोर फेर धरतात.

क्रमिक पुस्तकांमधूनही त्यांची चरित्रे येऊ दिली नाहीत. अनुल्लेखाने त्यांच्या कार्याची महती गाडून टाकली जातेय. त्यांच्या अतुलनीय पराक्रमाची यशोगाथा बासनात गुंडाळून ठेवण्याचा प्रयत्न केला गेला. महात्मा गांधींचा गौरव करण्याच्या प्रयत्नांमध्ये त्यांची शिकवण तरी अंमलात आणली गेली का? तर ती पण नाही. राष्ट्रप्रेमाचे वाण स्वीकारलेले आत्म्यातून रंगलेले असतात. त्यांना बाहेरून रंगावे लागत नाही. बाहेरून रंगलेल्यांनी देशाचा विचार न करता आपली उखळे पांढरी करण्यात आपल्या हयाती घालविल्या. शिष्टाचाराची जागा भ्रष्टाचाराने व्यापली. भ्रष्टाचार हा राष्ट्रीय कार्यक्रम मानला. खरी देशसेवा लोप पावली. देशभक्तीला देशोधडीला लावण्यात आले. देशभक्तीच्या जागी धनभक्ती बोकाळली. खुर्चीभक्ती, भाषाभक्ती, सीमाभक्ती अशा वेगवेगळ्या भक्त्या उफाळून आल्या. देशभक्तीचा, देशसेवेचा, वारसा चालविण्यापेक्षा स्वतःचा वारसा चालविण्यात धन्यता मानली जात आहे.

परकीय शक्तींच्या हस्तक्षेपांना पायबंद नसल्यामुळे देश दिवसेंदिवस खिळखिळा होत चालला आहे. देशाची बाह्य आणि अंतर्गत सुरक्षा ढासळली आहे. देशविरोधी कृत्ये करणाऱ्या नक्षलवाद्यांनी एक-तृतीयांश भारतावर आपला पंजा कसला आहे. धर्माच्या नांवाखाली हिंसाचार राजरोसपणे उघड माथ्याने केला जात आहे. या

देशविरोधी कृत्यांबद्दल निषेध खलित्यांशिवाय कसलीही कठोर उपाययोजना निर्धाराने अंमलात आणली जात नाही. केलेल्या उपाययोजना मतपेटीवर लक्ष ठेवून केल्या जात आहेत. मतांच्या लाचारीतून गुन्हेगार प्रवृत्तीचे लांगूलचालन करण्यात स्पर्धा लागली. या गुन्हेगार वृत्तींचा राजकारणात येण्याचा मार्ग प्रशस्त करण्याची शिकस्त सुरू आहे. धर्मांधप्रवृत्तींना मान्यता मिळत आहे.

समाजामध्ये तेढ निर्माण करून सत्ता काबीज करण्याची अहमहमिका लागली आहे. अशा प्रवृत्तींना प्राधान्य देऊन, 'महान भारत, बलवान भारत !' अशी स्वप्ने जनसामान्यांना दाखवून दिशाभूल केली जात आहे.

बलवान भारतासाठी राष्ट्रीय चारित्र्य असणाऱ्या नेतृत्वाची आवश्यकता आहे; याचाच आम्हांला विसर पडत चाललेला आहे. अशी नेतृत्वे नुसत्या मतपेटीतून, धनदांडग्यांच्या मधून किंवा धर्मांधतेला पोसणाऱ्या प्रवृत्तींमधून निर्माण होणार नाहीत; तर ती निर्माण होतील या स्वातंत्र्यप्रेमींच्या, क्रांतिकारकांच्या, राष्ट्रीय विचारवंतांच्या, देशोधडीला लागलेल्या देशभक्तांच्या सांडलेल्या रक्तातून, जाज्वल्य देशाभिमानातून, त्यांच्या त्यागी वृत्तीतून ! ते करतील बलवान भारतासाठी असीमांचे साहस.

क्रांतिकारकांच्या जीवनचारित्र्यातून, त्यांच्या त्यागांतून, त्यांच्या अतुलनीय पराक्रमांमधून प्रेरणा घेऊन उद्याचा बलवान भारत नक्कीच घडेल, असा आशावाद उराशी बाळगून गेली तीस वर्षे व्याख्यानांच्या माध्यमातून क्रांतिकारकांची चरित्रे मांडण्याचा सातत्याने आम्ही प्रयत्न करीत आहोत. याच प्रयत्नांचा भाग म्हणून क्रांतिकारकांच्या जीवनावरील **'आझादी के दीवाने'** हे माहितीचे चित्र प्रदर्शन वेगवेगळ्या ठिकाणी प्रदर्शित केले आहे. त्याला समाजातील अनेक मान्यवरांबरोबर अनेक नेत्यांनीही भेटी देऊन या प्रयत्नांचे कौतुक करून त्याची आवश्यकताही प्रतिपादित केली आहे.

क्रांतिकारकांची चरित्रे अभ्यासताना त्यांची घरे, जन्मस्थळे, त्यांचा वावर असलेली ठिकाणे, हौतात्म्य स्थळे पाहण्याचा तसेच त्यांच्या वारसांना भेटण्याचा योगही जुळून आला. या स्थळांना भेटी देताना तीर्थस्थळांना भेटी दिल्याचे समाधान लाभले.

या भेटींमध्ये शिवपुरीमधील (मध्य प्रदेश) तात्या टोपे यांना ठेवण्यात आलेली कोठडी पाहायला मिळाली. शिवपुरी उप जेलमध्ये असलेली ही कोठडी आजही कैदी ठेवण्यासाठी वापरली जाते. तात्या टोपे यांच्यावर चालविण्यात आलेल्या अभियोगात वापरण्यात आलेले कोर्ट आज दुरावस्थेत असून ते ढासळण्याच्या मार्गावर आहे. खटल्यात तात्या टोपेंना सार्वजनिक ठिकाणी फाशी देण्यात आली, ते मैदान आज मुलांच्या खेळांसाठी वापरले जाते.

पंजाबमधील नवाशहर जिल्ह्यामधील (सध्याचे नाव-शहीद भगतसिंग नगर जिल्हा) खडकडकलाँ (Khatkar Kalan) हे हुतात्मा भगतसिंह यांचे गाव. त्यांच्या घराचे आता स्मारकात रूपांतर करण्यात आले असून जवळच उत्तम संग्रहालयही उभारण्यात आले आहे.

पंजाबमधील फिरोजपूर जिल्ह्यातील सतलज नदीच्या काठावरील हुसैनीवाला येथे हुतात्मा भगतसिंह, हुतात्मा राजगुरु, हुतात्मा सुखदेव यांचा अंत्यविधी करण्यात आला, या ठिकाणीं त्यांचे भव्य स्मारक उभारण्यात आलेले आहे. याच ठिकाणीं हुतात्मा भगतसिंहांचे सहकारी बटुकेश्वर दत्त यांचाही अंत्यविधी करण्यात आला. याच ठिकाणीं हुतात्मा भगतसिंह यांच्या माता विद्यावतीदेवी यांचेही त्यांच्या इच्छेनुसार दाहसंस्कार करण्यात आले. बटुकेश्वर दत्त आणि पंजाबमाता विद्यावतीदेवी यांच्या स्मारकशिला उभारण्यात आल्या आहेत. हे स्थान भारत-पाक सीमेजवळ आहे.

मध्यप्रदेश मधील अलिराजपूर जिल्ह्यातील भावरा (सध्याचे नाव-चंद्रशेखर आझाद नगर) हे चंद्रशेखर आझाद यांचे जन्मगाव. त्यांचे जन्मस्थळ असलेली झोपडी पाडून त्याठिकाणी सरकारने आझादांचे चांगले स्मारक उभे केले आहे. त्यामध्ये आझादांचे जीवनचरित्र चित्ररूपाने मांडले आहे. आझादांचे वास्तव्य काही काळ झाशी-ओर्च्छा रस्त्यावरील ढिमरपुरा (टिकमगड जिल्हा, मध्यप्रदेश) येथे होते. ढिमरपुरा (सध्याचे नाव आझादपुरा) हे सातार नदीच्या काठावर वसले असून तेथील आझादांची कुटिया, त्यांनी स्थापन केलेले हनुमान मंदिर आजही पाहायला मिळते. ढिमरपुरा आज 'आझादपुरा' म्हणून ओळखले जाते.

अलाहाबादमधील (सध्याचे नाव प्रयागराज) आल्फ्रेड पार्क मध्ये आझादांना इंग्रजांविरुद्ध लढताना हौतात्म्य प्राप्त झाले. ते पार्क आज 'आझाद पार्क' म्हणून

ओळखले जाते.

झांशीमध्ये (उत्तर प्रदेश) बडगाव गेट स्मशानभूमी मध्ये आझादांच्या माता जगराणीदेवी यांचा अंत्यविधी झाला, त्याठिकाणीं त्यांचे स्मारक उभारण्यात आलेले आहे. या स्मारकासमोर नतमस्तक होताना माता जगरानीदेवी यांना सोसाव्या लागलेल्या यातनांच्या आठवणींनी मनाला खूप वेदना होतात.

या तीर्थक्षेत्रांसह हुतात्मा उधमसिंह यांचे सुनाम, जिल्हा संगरुर, पंजाब येथील स्मारक. अमृतसरमधील जालियनवाला बाग, नानासाहेब पेशवे यांचे बिठूर (कानपूर), कुँवरसिंहांचे आरा (बिहार), बेहरामपाडामधील स्केअर फिल्ड ग्राउंड, बॅरकपूरमधील मंगल पांडे यांचे फाशीचे स्थळ, राजगुरुनगर (पुणे) मधील हुतात्मा शिवराम हरी राजगुरु यांचे जन्मस्थळ, पुण्यातील उमाजी नाईकांचे स्मृतिस्थळ, कित्तुरच्या राणी चन्नम्मा, रायण्णा संकोळी (कर्नाटक), कट्टा बोम्मन (तामिळनाडू), चेतासिंगाचे सिरोंज (म.प्र.), सदाशिवराव मलकापूरकर यांचे रेहली (म.प्र.), राणी लक्ष्मीबाई यांची झांशी या व अशा अनेक तीर्थक्षेत्रांना, प्रेरणास्थळीं जाऊन तिथली धूल मस्तकीं लावण्याचे भाग्य मला मिळाले, याचे समाधान वाटते.

हुतात्मा भगतसिंहांना लाहोर (पाकिस्तान) येथे फाशी देण्यात आले होते. ते मध्यवर्ती कारागृह नामशेष करण्यात आले आहे. याच कारागृहामध्ये शेकडो लोकांना इंग्रजांनी फासावर चढविले होते. त्यांची स्मृती म्हणून एक साधा दगडही त्या ठिकाणी लावण्यात आलेला नाही. तर तेथील कोठड्यांच्या जागीं निवासस्थाने बांधण्यात आली. या निवासस्थानांना 'शादमान' असे नांव ठेवण्यात आले. शादमान म्हणजे आनंद भुवन होय. फाशीच्या तख्ताच्या जागीं चौकाचा वर्तुळाकार उभारण्यात आला असून त्याला वळसा मारून वाहनांना जावे लागते. या चौकाला 'फवारा चौक' म्हटले जाते.

काळाचा महिमा कसा असतो बघा ! याच चौकात गाडीतून वळसा मारीत असताना पाकिस्तानातील खासदार अहमद रझा कासुरी यांच्यावर गोळ्या झाडण्यात आल्या. त्यावेळी कासुरींच्या शेजारी बसलेले त्यांचे वडील याच चौकात घायाळ होऊन पडले होते.

हुतात्मा भगतसिंह, हुतात्मा राजगुरु, हुतात्मा सुखदेव यांना फाशी दिल्यानंतर त्यांच्या प्रेतांची कायदेशीर ओळख पटवायला निषेध म्हणून कोणीही पुढे आलेले नव्हते. त्यामुळे इंग्रजांसमोर अडचण निर्माण झाली असताना या खासदार अहमद रझा कासुरीच्या आजोबांनी पुढाकार घेऊन भोचकपणे हुतात्म्यांच्या प्रेतांची ओळख पटविली होती. ओळख पटविणाऱ्या आजोबांच्या नशिबीं बरोबर त्याच ठिकाणीं मरणासन्न अवस्थेत आपल्या मुलाला पाहण्याची वेळ आली. केलेल्या कर्माचे फळ त्याच ठिकाणीं कासुरींना मिळाले, असे लाहोर मधील अनेक वृद्धमंडळींचे म्हणणे आहे. पुढे याच खुनाच्या खटल्यात झुल्फीकार भुट्टो, पाकिस्तानचे पंतप्रधान यांना फासावर चढविण्यात आले.

याच चौकात, हुतात्मा भगतसिंह यांचे स्मारक व्हावे म्हणून लाहोर मधील तरुणांनी मोर्चा काढला. यात जवळजवळ दहा हजार तरुण सामील होते, अशी बातमी होती. या मोर्चामधील एक घोषणा अशी होती, 'शहीद भगतसिंह आज भी जिंदा हैं। सीमा के उसपार भी और सीमा के इस पार भी।' हुतात्मा भगतसिंह यांच्यावर लाहोर मधील आजची पिढीही प्रेम करते, पण मुलतत्ववाद्यांनी भगतसिंह यांना 'शहीद' उपाधी लावण्याचे नाकारले. शहीद म्हणजे मुस्लिम धर्मासाठी प्राणार्पण करणे. भगतसिंहांनी मुस्लिम धर्मासाठी त्याग केलेला नाही. त्यामुळे त्यांना शहीद म्हणण्यात येऊ नये. त्यामुळे ते स्मारकच वादाच्या भोवऱ्यात अडकले.

जिहादी अतिरेक्यांना 'शहीद' म्हणण्याचा प्रघात आहे. सध्या अतिरेकी अजमल कसाब (मुंबईवरील हल्ला) आणि अफजल गुरु (संसदेवरील हल्ला) यांना 'शहीद' म्हणून संबोधण्यात येत आहे. पॅलेस्टाईन, लेबाननमधील आत्मघातकी अतिरेक्यांना शहीद म्हणतात. या अतिरेक्यांच्या रांगेत राष्ट्रीय ध्येयवादाचा हिरिरीने पुरस्कार करणाऱ्या क्रांतिकारकांना बसविणे, ही त्यांच्या ध्येयवादाची क्रूर चेष्टाच आहे.

भारताविरुद्ध युद्ध पुकारणारा अतिरेकी अजमल कसाब हा शहीद कसाब, तर त्याचा प्रतिकार करताना हौतात्म्य पत्करणारे पोलिस अधिकारी करकरे, कामठे, साळसकर तसेच ओंबळे आणि उन्नीकृष्णन (कमांडो) हेही शहीदच. पुण्यातील एका रस्त्याला शहीद हेमंत करकरे असे नांव देण्यात आलेले आहे.

यामध्ये शब्दांचा खेळ करण्याची माझी कुवत नाही, पण शहीद (मूळ अरेबिक शब्द) चा अर्थ समजून घेण्याची व योग्य ठिकाणी वापरण्याची गरज आहे. तिसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने पुस्तकातील शहीद शब्द कटाक्षाने वगळून तेथे **'हुतात्मा'** शब्दाचा वापर केलेला आहे.

मुलांच्या समोर उत्तम चारित्र्य घडविणारे आदर्श असावेत म्हणून 'आझादी के दीवाने' या प्रदर्शनाचा प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी मा. आमदार दीपक पायगुडे (लोकसेवा प्रतिष्ठान, पुणे-११), माताजी कृष्णा कश्यप (पुण्यधाम आश्रम), श्री. बाळासाहेब रुणवाल (मेरे अपने संस्था), श्री. निलेश गावडे (गड किल्ले सेवा समिती), श्री. पुरुषोत्तम बाबर (आधार समाजसेवी संस्था), श्री. दादा पासलकर (महाराष्ट्र शाहीर परिषद), श्री. राजकुमार ढमाले (भक्ती शक्ती प्रतिष्ठान) तसेच प्रा. सतीश वाघमारे, रवी ढवाण, शिवाजी निंबाळकर, सुरेश निंबाळकर, राम कुतवळ, श्रीरंग वाघ, सुहास भेगडे, उमेश वाघेला, रवी फुगे, रघुराज एरंडे, अमर शिंगाडे, तसेच संस्कृती संवर्धन संस्थेचे संतोष घुले, प्रा. गंगाधर रासगे, प्रा.सौ.राजश्री कसबे असे अनेकांचे सहकार्य लाभत आहे. याशिवाय अनेक सहकाऱ्यांनी हा प्रकल्प आपल्या शिरावर घेतला आहे.

याच प्रकल्पाचा भाग म्हणून स्वातंत्र्य संग्रामातील समिधा ची तिसरी आवृत्ती प्रकाशित करण्याची संधी मिळाली आहे. वेळीअवेळीं सूचना करून सतत सुधारणा करून मुद्रणप्रत तयार करणारे श्री. अनिकेत यादव यांचे आभार मानणे औचित्याला धरून होईल. मुद्रणप्रत तपासणारे प्रा. रा. आ. कदम सरांचेही आभार. श्री. अशोकराव रानवडे (उद्योजक) यांनी केलेल्या सहकार्यामुळेच पुस्तकाची ही आवृत्ती काढणे आवाक्यात आले आहे. क्रांतिकारकांच्या प्रेरणेनेच पुस्तकाला गोमटेपण मिळालेले आहे. त्यातील त्रुटी मात्र माझ्या आहेत, हे मी नम्रपणे कबुल करतो. वाचकांनी त्या निदर्शनास आणल्यास त्याची निश्चितच दखल घेतली जाईल.

**– प्रमोद मारुती मांडे**



***

## ❋ लेखकाचे मनोगत ❋ ('स्वातंत्र्यसंग्रामातील अंगार' या ग्रंथामधून)

भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात अनेक क्रांतिकारकांनी आपल्या प्राणांची आहुती दिली. या क्रांतिकारकांनी आपले ध्येय गाठण्यासाठी आपल्या सर्वस्वाचा त्याग केला. त्यांचा त्याग, बलिदान, त्यांची प्रखर राष्ट्रभक्ती आजही आपल्याला प्रेरणादायी आहे. दुर्दैवाने क्रमिक पुस्तकांत यांची चरित्रे येऊ शकली नाहीत, किंबहुना ती येऊ दिली नाहीत. त्यांच्या आठवणी आज काळाच्या ओघात नाहीशा होत चालल्या आहेत. क्रांतिकारकांची चरित्रे तरूणांसमोर असल्यास तरूणांना निश्चितपणे आदर्शवाद जोपासता येईल. तरूणांसमोर आदर्श नसला, दिशा नसली तर वाटचाल करताना निश्चितच ते भरकटण्याची शक्यता आहे. म्हणून 'स्वातंत्र्यसंग्रामातील समिधा' या पुस्तकात समावेश नसलेल्या अशा काही क्रांतिकारकांची माहिती लोकमत, पुणे मध्ये प्रकाशित केली होती. या मालिकेस उत्तम प्रतिसाद मिळाल्यामुळे अनेक वाचकांच्या आग्रहामुळे आणि ही माहिती एकत्रित मिळावी म्हणून 'स्वातंत्र्यसंग्रामातील अंगार' या पुस्तकाची निर्मिती केली.

क्रांतिकारकांचा इतिहास सर्वदूर पसरावा. त्यांच्या त्यागाचा, बलिदानाचा, पराक्रमाचा, निष्ठेचा, राष्ट्रभक्तीचा सुगंध सर्वत्र पसरावा आणि या राष्ट्राच्या उभारणीमध्ये तो आदर्श सर्वांसमोर असावा. या भावनेमधून या पुस्तकाची निर्मिती केली आहे. क्रांतिकारकांवरील श्रद्धेने हे लिहिलेले आहे. यात काही चुका आढळल्यास वाचकांनी त्या माझ्या निदर्शनास आणून द्याव्यात, ही नम्र विनंती.

या पुस्तकासाठी प्रसिद्ध साहित्यिक प्रा. विलासराव पाटील यांनी विनाविलंब प्रस्तावना लिहून दिली. त्यांचे परखड लिखाण निश्चितपणे विचार करायला लावतील. त्यांचे आभार मानणे गैर ठरणार नाही. प्रा. सतीश वाघमारे तसेच शाहीर दादा पासलकर यांनी दिलेले प्रोत्साहन मला निश्चितपणे मोलाचे आहे. नरेंद्र शेलार, राजेंद्र शेलार, प्रतापराव गायकवाड, अरविंद भोसले, राजकुमार ढमाले, सुहास भेगडे, सुरेश निंबाळकर, निलेश गावडे हे समर्थपणे पाठीशी उभे राहिल्यामुळे हे धाडस करणे मला शक्य झाले. अनिकेत यादव यांनी अतिशय कमी वेळात या पुस्तकाचे डी.टी.पी. करून दिले म्हणून या पुस्तकाला आकार देणे शक्य झाले. प्रफुल्लता प्रकाशनचे गुलाबराव सपकाळ यांनी हे पुस्तक विनाविलंब प्रकाशित करण्याचा निर्णय घेतला म्हणून त्यांचे आभार मानणे औचित्याला धरून होईल.

पुणे, दि. २१/७/२००७

**– प्रमोद मारुती मांडे**

# आझादी के दिवाने

## ४००० + क्रांतिकारक....

**लेखक : प्रमोद मारुती मांडे**

संपादक : अनिकेत अंकुश यादव
प्रकाशक : अनिकेत एंटरप्रायझेस,
४१७, शुक्रवार पेठ, पुणे ४११००२.




**ग्रंथाची किंमत**
**रुपये ५००/-**
**एकूण पृष्ठसंख्या -४७६**
**१२ रंगीत पाने**
**हार्ड बाऊंड**

### ग्रंथाची वैशिष्ट्ये -

- स्वातंत्र्य संग्रामातील समिधा, स्वातंत्र्य संग्रामातील अंगार व स्वातंत्र्य संग्रामातील अग्निशलाका या ३ ग्रंथांचा एकत्रित मराठी ग्रंथ.
- १४६ क्रांतिकारकांच्या प्रकाशचित्रांसह रोमहर्षक माहिती
- ८००+ स्वातंत्र्य सैनिकांची छायाचित्रे
- ४०००+ क्रांतिकारकांची वर्णानुक्रमानुसार यादी
- माहितीपूर्ण परिशिष्टे


## Publisher : Aniket Enterprises

Address : 417, Shukrawar Peth, Opp. Khadak Police Station, Shivaji Road, Pune - 411002.
Mob. 7588291483, 9822743244. Email - aniketyadav84@gmail.com